**अ‍ॅड. श्री. प्रविण चव्हाण, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत...**

**शिवाजीनगर पोलीस ठाणे, पुणे येथे दाखल गु. र. क्र. ३७४/२०१७, या गुन्हयातून उद्भवणाऱ्या मा. अपर सत्र न्यायालय, शिवाजीनगर, जि. पुणे व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन प्रकरणामध्ये कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०२२१/प्र.क्र.३२/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० डिसेंबर, २०२१

**संदर्भ:**-१. शासन अधिसूचना,विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२१/यू.ओ.आर.२०/डी-१४,दि. ९.८.२०२१
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. २९/७/२०१५
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. १६/६/२०१७

**शासन निर्णय :-**

शिवाजीनगर पोलीस ठाणे, पुणे येथे दाखल गु.र.क्र.३७४/२०१७, या गुन्हयातून उद्भवणाऱ्या मा. अपर सत्र न्यायालय, शिवाजीनगर, जि. पुणे व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्याय प्रकरणी मा. न्यायालयीन कामकाज शासनाच्यावतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या अ‍ॅड. श्री. प्रविण चव्हाण यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा. अपर सत्र न्यायालय, शिवाजीनगर पुणे शहर व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

१) प्रति परिणामकारक सुनावणी फी - रु.४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त)
२) विचारविनिमय फी (प्रतितास) - रु.३,०००/- (रुपये तीन हजार फक्त)
(प्रतिदिन कमाल मर्यादा रुपये ३०,०००/-)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अ‍ॅड. श्री. प्रविण चव्हाण यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशी अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार तसेच संदर्भ क्र.२ व ३ वरील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२११२३०१२३४२८३४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.12.30 12:35:02 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे
३) अपर पोलीस आयुक्त, गुन्हे, पुणे शहर, पुणे
४) विशेष पोलीस महानिरीक्षक (का. व सु.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, पुणे
८) ॲड. श्री. प्रविण चव्हाण, १०२, मातृकृपा अपार्टमेंट, मॉडेल कॉलनी, अम्बेसेडर जवळ, पुणे
९) कार्यासन अधिकारी (का-१४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (पोल-१०)